विनियम १३(२) खालील गृहनिर्माण योजना राबविण्याबाबतचे धोरण.

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग,
## शासन निर्णय क्रमांक वाटप २०१५/प्र.क्र. २२३ /गृनिप
## मंत्रालय ,मुंबई - ४०० ०३२.
## दिनांक : १२ ऑगस्ट ,२०१५

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः वाटप ११०५/प्र.क्र.१८०/भाग-१/गृनिभू, दि. ०८ फेब्रुवारी २००७

२) शासन निर्णय क्रमांकः वाटप ११०५/प्र.क्र.१८०/भाग-१/गृनिभू, दि. २५ एप्रिल, २०११

प्रस्तावना :-

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गृहनिर्माण (मिळकत व्यवस्थापन, विक्री, हस्तांतरण आणि सदनिकांची अदलाबदल) विनियम १९८१ च्या विनियम १३(२) अंतर्गत विशिष्ट गटासाठी राबवावयाच्या गृहनिर्माण योजनांबाबतचे शासनाचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. तसेच अशा योजना राबविताना त्या गटांमधील लाभार्थी निश्चित करावयाची कार्यपध्दती ठरविण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र गृहनिर्माण (मिळकत व्यवस्थापन, विक्री, हस्तांतरण आणि सदनिकांची अदलाबदल) विनियम १९८१ च्या विनियम १३(२) अंतर्गत गृहनिर्माण योजना राबविण्याबाबतच्या दि. ०८.०२.२००७ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या गटामधील अनुक्रमांक १ येथील गटासंदर्भात असलेल्या तरतुदींऐवजी पुढीलप्रमाणे सुधारीत तरतुदी लागु करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | विनियम १३(२) अंतर्गत गट | पात्रता |
|---|---|---|
| १. | मा. सर्वोच्च न्यायालय, मा. उच्च न्यायालय व इतर कनिष्ठ न्यायालयात कार्यरत असलेले न्यायाधीश - एकत्रितरित्या किंवा न्यायाधीशांच्या वेगवेगळया संवर्गासाठी | मा. सर्वोच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालयाच्या न्यायाधीशांचे प्रस्तावित सहकारी गृहनिर्माण संस्थेकरीता सभासदत्व मिळण्याबाबतचे अर्ज संबंधित न्यायालयाच्या महाप्रबंधक यांच्याकडून व जिल्हा व कनिष्ठ न्यायालयाच्या न्यायाधीशांचे अर्ज संबंधित न्यायालयाच्या निबंधकाकडून मागविण्यात यावेत. |

सदर शासन निर्णयातील अन्य गट, त्यांच्या पात्रता व उर्वरित तरतुदी कायम राहतील .

वरील धोरणा संदर्भातील शासन निर्णय दि. २५.०४.२०११ मधील परिच्छेद २ मध्ये, "हे वाक्य वगळण्यात येत आहे" या वाक्यानंतर "तथापि भारताच्या घटनेअंतर्गत निर्माण झालेली पदे धारण करणारे मा. सर्वोच्च न्यायालयाचे व मा. उच्च न्यायालयाचे न्यायाधीश यांच्याबाबत म्हाडामार्फत विनियम १३(२) अंतर्गत विशेष गृहनिर्माण योजना राबविताना जाहिराती देणे व सोडत काढणे ही कार्यपध्दती आवश्यक राहणार नाही." अशी तरतुद करण्यात येत आहे. संदर्भाधीन शासन निर्णयातील इतर तरतुदी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०८१३१२०९१५०४०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

M R Parkar

Digitally signed by M R Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=M R Parkar
Date: 2015.08.13 12:14:29 +05'30'

**(म.रा. पारकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव व सचिव
३. मा. सभापती, विधानपरिषद / मा. अध्यक्ष, विधानसभा
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / मा. विरोधीपक्ष नेता, विधानसभा
५. मा. सर्व विधानसभा आणि विधानपरिषद सदस्य
६. मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव
७. मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव
८. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण
९. सर्व गृहनिर्माण मंडळाचे मुख्य अधिकारी
१०. सर्व मंत्रालयीन विभाग
११. गृहनिर्माण विभागातील सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी
१२. निवडनस्ती.